**जागतिक बँक सहायित महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासास चालना देण्यासाठी संस्थात्मक क्षमता सक्षमीकरण (MahaSTRIDE) प्रकल्पाच्या फलश्रुती आधारीत कार्यक्रम (P for R) या घटकांतर्गतच्या बाह्य हिश्श्यासाठी लेखाशिर्षास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूबीके-२०२४/प्र.क्र. १५० /का.१४१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी, २०२५.

वाचा: १) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र डब्ल्यूबीके-२०२४/प्र.क्र. १३/का.१४१७, दिनांक १४.०३.२०२४.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिट्युशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन- मित्र यांची टिप्पणी क्रमांक मित्र/प्र.क्र.८३/२०२४, दि.१०.०९.२०२४ व पत्र क्र.मित्र/ सं.वि./ प्र.क्र.८३/२०२४, दिनांक ३.१२.२०२४

**प्रस्तावना:**

नियोजन विभागाच्या संदर्भ १ येथील दिनांक १४ मार्च,२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जागतिक बँक सहायित महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासास चालना देण्यासाठी संस्थात्मक क्षमता सक्षमीकरण (MahaSTRIDE) प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी जागतिक बँकेकडून फलश्रुती आधारीत कार्यक्रम (Program for Result- P for R ) या घटकांतर्गत मिळणारा निधी आणि प्रकल्पावर त्या अंतर्गत होणाऱ्या खर्चासाठी स्वतंत्र लेखार्शिष निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य कायर्कारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिटयुशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन- मित्र यांच्या संदर्भ क्र.०२ येथील टिप्पणीन्वये शासनास प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावास अनुसरुन नवीन लेखाशीर्ष मंजूर करण्याची व सदर लेखाशिर्षासाठी नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक बँक सहायित महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासास चालना देण्यासाठी संस्थात्मक क्षमता सक्षमीकरण (MahaSTRIDE) प्रकल्पासाठी फलश्रुती आधारीत कार्यक्रम (P for R ) या घटकांतर्गत मिळणारा निधी आणि प्रकल्पावर त्यांतर्गत होणाऱ्या खर्चासाठी नवीन लेखाशिर्षास पुढीलप्रमाणे मंजुरी प्रदान करण्यात येत आहे :

| | |
|---|---|
| मागणी क्र. ०७ | Demand ०७ |
| ३४५१ - सचिवालयीन सेवा | ३४५१ - Secretarial Services |
| ०० | ०० |
| दत्तमत ०९२ - इतर कार्यालये | Voted ०९२ - Other Offices |
| ०० | (००) |

| | |
|---|---|
| (००) (०४) - महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासाला चालना देण्यासाठी संस्थात्मक सक्षमीकरण प्रकल्प - महास्ट्राईड (फलश्रुति आधारित कार्यक्रम) (जागतिक बँकेचा वाटा ७०%) | (००)(०४)- Maharashtra Strengthening Institutional Capabilities in Districts for Enabling Growth Project - Mahastride (Programme for results) (World Bank External Share ७०%) |
| कार्यक्रम/दत्तमत ३४५१A२३३ | Scheme /Voted ३४५१A२३३ |

२ महास्ट्राईड प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने निधी खर्च करण्यासाठी महाराष्ट्र इन्स्टिटयुशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन- मित्र यांच्या आस्थापनेवरील सह सचिव (वेतन श्रेणी एस- २७ रु.१२३१००-२१५९००) यांना नियंत्रक अधिकारी व कक्ष अधिकारी (वेतन श्रेणी एस- २० रु.५६१००-१७७५००) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३ आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी यांना उपरोक्त लेखाशिर्षाखाली वितरीत अर्थसंकल्पीय तरतुदीमधुन केवळ महास्ट्राईड प्रकल्पाच्या फलश्रुती आधारीत कार्यक्रम (P for R ) या घटकांतर्गत खर्चाची देयके पारित करता येतील. त्याव्यतिरिक्त अन्य देयके कोषागारातून आहरित करता येणार नाहीत. सदर लेखाशीर्षाखाली होणा-या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी “नियंत्रक अधिकारी” यांची राहील. सदर लेखाशीर्षाखालील निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर व वितरीत करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा. राज्य शासनामार्फत वेळोवळी विहीत केलेले नियम निर्गमित करण्यात आलेले आदेश, शासन निर्णय, परिपत्रक यांची अंमलबजावणी करून उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे व लोकलेखा समिती व इतर आक्षेप यावरील कार्यवाही व उपाययोजना नियंत्रक अधिकारी यांनी वेळीच पार पाडाव्यात. तसेच मा.महालेखापाल कार्यालय व इतरांकडून घेण्यात येणाऱ्या आक्षेपांची पूर्तता ही विनाविलंब होईल याबाबतची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महालेखाकार कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई यांचे पत्र सं. ख.वि./चा.-१/नियोजन विभाग/युओआर-२८६/२०२४-२५/२२२९, दिनांक ०५/०२/२०२५ आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.विवि/ अर्थ १६, दिनांक ०८/०१/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२५०२२४१३०२२२८९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK BANSI GAIKWAD

Digitally signed by VIVEK BANSI GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=2dcd8a369b90c95da2ba1482ac5185a9b5d5d8a62596d71411bc96a1a7d9bad5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1ECC1A130CD0429F39A57C63D4B57C6C3ACFCA13C103BFF9F5EF5D51BD17AD08, cn=VIVEK BANSI GAIKWAD
Date: 2025.02.24 13:03:54 +05'30'

**( विवेक गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई.

२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिटयूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन- मित्र, निर्मल भवन, नरीमन पॉईंट, मुंबई - २१
४. वित्त विभाग (व्यय-८ / कोषा. प्रशा- ५), मंत्रालय, मुंबई
५. नियोजन विभाग / कार्यासन- १४२५ अ/, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती ( कार्यासन-१४१७)